**कार्यकारी अभियंता (स्थापत्य)**
**यांच्या बदल्या / पदस्थापना**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-१११८/प्र.क्र. १५८ (७) /सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३ ऑगस्ट, २०१८

**पहा:** १. शासन आदेश क्र. पीओजी-१११८/प्र.क्र.१२० (१६)/सेवा-१, दि.२७.६.२०१८
२. शासन आदेश क्र. टिएफएस-१११८/प्र.क्र.१५१ (१)/सेवा-१, दि.१७.७.२०१८

**शासन आदेश :-**

*संदर्भाधीन क्र.१ च्या आदेशान्वये, श्री. एस. एम. मांगुळकर, उप अभियंता, यांची पदोन्नतीने पदस्थापना कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड या रिक्त पदावर करण्यात आली होती. तद्नंतर संदर्भाधीन क्र-२ च्या आदेशान्वये, श्री. एस. एम. मांगुळकर, उप अभियंता, यांच्या पदोन्नती आदेशामध्ये अंशत: बदल करुन त्यांची सुधारीत पदस्थापना कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, औरंगाबाद या श्री. चिव्हाणे यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदावर करण्यात आली होती. परंतु सदर बदली आदेशा विरुध्द श्री. चिव्हाणे यांनी मा. म.प्र.न्यायाधिकरणात दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.५२४/२०१८ प्रकरणी मा. न्यायाधिकरणाने दि.१८ जुलै,२०१८ रोजी "प्रतिवादींनी मा. न्यायाधिकरणामध्ये शपथपत्र दाखल करेपर्यंत जैसे थे" परिस्थिती ठेवण्याचे आदेश दिलेले असल्यामुळे श्री. चिव्हाणे हे पूर्ववतपणे कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, औरंगाबाद या पदावरच कार्यरत राहतील. सबब, श्री. मांगुळकर हे पदस्थापनेविना राहतील.*

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक बांधकाम विभागातील श्री. एस. एम. मांगुळकर, उप अभियंता, मुख्य अभियंता कार्यालय, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांच्या संदर्भाधीन आदेशान्वये करण्यात आलेल्या पदोन्नतीउपरांत पदस्थापनेमध्ये आता अंशत: बदल करण्यात येत असून त्यांची सुधारित पदस्थापना प्रशासकीय सोयीस्तव कार्यकारी अभियंता, जागतिक बँक प्रकल्प विभाग, औरंगाबाद या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

३. श्री. मांगुळकर यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती ही अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, श्री. मांगुळकर यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे कार्यभार सोडल्याचा तसेच कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा. विहीत कालावधीत अधिकारी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक

कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३०(सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्याचा रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

५. श्री. मांगुळकर यांच्या पदस्थापनेतील बदल प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील.

६. श्री. मांगुळकर यांनी नवीन पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०३१६५७१६६४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Palande Kisanrao Babanrao

Digitally signed by Palande Kisanrao Babanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514911d765e05f227cdbfc15f18f6435e0084f59637ab95f9aefeebc40be45e7, serialNumber=0408959d1a26199fdc46e13b6a0ce1c7ecf2be242adc4459176436f76feba2ee, cn=Palande Kisanrao Babanrao
Date: 2018.08.03 18:33:29 +05'30'

**( किसनराव पलांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ कोकण/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
३. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
४. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड / औरंगाबाद,
९. श्री. एस. एम. मांगुळकर, उप अभियंता, मुख्य अभियंता कार्यालय, सा.बां.प्रादेशिक विभाग, औरंगाबाद,
१०. श्री. ज. शं. चिव्हाणे, कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, औरंगाबाद,
११. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१३. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१५. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१६. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१७. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. सार्वजनिक बांधकाम विभाग / आस्था-१, आस्था-३, सेवा-६, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
१९. निवडनस्ती.